**सहाय्यक सरकारी वकील यांचे मानधनाची रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२४/प्र.क्र.७४ /परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २६ मार्च २०२४

**वाचा : -**

परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य मुंबई, यांचे पत्र क्र.पआका /अंमल -२ /सीतना आसं /सीतना नवापूर/२०२४/जा.क्र.३०१४ दि.०७.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरणांतर्गत सहाय्यक सरकारी वकील, श्री.आर.आर.पाटील यांनी सीमा तपासणी नाका,नवापूर येथील भूसंपादनाच्या वाढीव नुकसान भरपाईबाबत एल.ए.आर. नंबर ९/१३, १०/१३, १६/१३, २०/१३, २४/१३, ११/१३,१२/१३, २१/१३ व २३/१३ या प्रकरणामध्ये मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर नंदुरबार येथे सहायक सरकारी वकील म्हणून कामकाज पाहिले आहे. त्या दाव्याप्रकरणी संबधित मानधनाची रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरणांतर्गत सहायक सरकारी वकील, श्री.आर.आर.पाटील यांनी सीमा तपासणी नाका,नवापूर येथील भूसंपादनाच्या वाढीव नुकसान भरपाईबाबत एल.ए.आर. नंबर ९/१३, १०/१३, १६/१३, २०/१३, २४/१३, ११/१३,१२/१३, २१/१३ व २३/१३ या प्रकरणामध्ये मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर नंदुरबार येथे कामकाज पाहिले आहे. त्यानुसार त्यांच्या मानधनाची रक्कम रु.७६,४८५/-(अक्षरी शहाहत्तर हजार चारशे पंच्याऐंशी रुपये फक्त) इतके मानधन अदा करण्यास प्रशासकीय तसेच वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च हा " मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनावरील कर, (०२) प्रादेशिक कार्यालये, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालये (२०४१ ००१८) (दत्तमत) (अनिवार्य), २८- व्यायसायिक सेवा " या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग -पहिला, उप विभाग-दोन,अनुक्रमांक ४८ व महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५, मधील नियम १६६ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२६१४४४२६४९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARAT RAMCHANDRA LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.03.26 14:53:54 +05'30'

**( भरत लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, नंदुरबार
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार
६. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती (परिवहन-४)